**शासन सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील सरळसेवेची पदे दीर्घकाळ रिक्त राहू नयेत यासाठी विहित कालावधीत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याची कार्यवाही करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र :** मलोआ १०१४/प्र.क्र.१२३/८
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:१२ सप्टेंबर,२०१४

**संदर्भ -** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मलोआ २०१०/प्र.क्र.२८०/१०/आठ, दिनांक ८.४.२०११

**शासन परिपत्रक :**

शासन सेवेतील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील सरळसेवेची पदे दीर्घकाळ रिक्त राहू नयेत यासाठी विहित कालावधीत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना व भरती प्रक्रियेचे वेळापत्रक संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहे. सध्या विविध प्रशासकीय विभागांतर्गत असलेली रिक्त पदांची संख्या व विविध प्रशासकीय विभागांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे सादर केलेल्या मागणीपत्रांमधील पदांची संख्या पाहता, रिक्त असलेल्या पदांच्या तुलनेत त्या त्या विभागांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला सादर केलेल्या मागणीपत्रांमधील पदांची संख्या अल्प आहे. परिणामी शासन सेवेत रिक्त पदांची संख्या बरीच जास्त असून ती विहित कार्यपध्दतीने भरण्यास बराच काळ लागेल.

ही बाब विचारात घेता असे कळविण्यात येते की, त्यांनी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचनांचे व वेळापत्रकाचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच सध्या असलेली रिक्त पदे व पुढील दीड वर्षात रिक्त होणारी संभाव्य पदे विचारात घेऊन त्या पदांना लागू असलेले आरक्षण, इत्यादी बाबी तपासून मागणीपत्राचा परिपूर्ण प्रस्ताव तात्काळ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे सादर करावा. तसेच यापुढे दर वर्षी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहित केलेले वेळापत्रक विचारात घेऊन सरळसेवेच्या रिक्त पदांसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१३०२०३९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JOSHI ANIL D

Digitally signed by JOSHI ANIL D
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=JOSHI ANIL D
Date: 2014.09.12 12:56:29 +05'30'

(अ. द. जोशी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
४) निवडनस्ती.